वितरण आदेश क्र.२
सन २०१७-१८

**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी,**
**नाथनगर, (उत्तर), पैठण, जिल्हा - औरंगाबाद**
**सहाय्यक अनुदान २०१७-२०१८(अनिवार्य)**
**एप्रिल व मे, २०१७ ( पहिला हप्ता )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मप्रप्र २०१७/प्र.क्र.६९/१७/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक २१ एप्रिल, २०१७

वाचा : १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१७/प्र.क्र.६८/अर्थसंकल्प ३, दि.१ एप्रिल, २०१७.
२. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१७/ प्र.क्र.७० /२०१७/२५, दि.५ एप्रिल, २०१७

**शासन निर्णय**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये वेतनेतर रु.२०.०० लाख व वेतने रु.१००.०० लाख अशी एकूण रु. १२०.०० लाख ( अक्षरी रुपये एकशे,वीस लाख फक्त) इतकी तरतूद करण्यात आली असून, त्यापैकी रु. २०.०० लाख ( अक्षरी रुपये वीस लाख फक्त) एवढे लेखा अनुदान एप्रिल व मे, २०१७ या दोन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी संदर्भाधीन क्र.२ च्या शासन परिपत्रकान्वये मंजूर झाले आहे. सदर अनिवार्य सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. **मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेला विकास प्रशिक्षण व तद्नुषंगिक खर्च तसेच अधिकारी व कर्मचारी यांचे वेतन यासाठी एप्रिल व मे, २०१७ या दोन महिन्यांकरिता लेखाअनुदानाच्या मर्यादेत अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले वेतनेतर रु. ३,३३,०००/- व वेतने रु.१६,६७,०००/- असे एकूण रु. २०,००,०००/- (रुपये वीस लाख फक्त ) इतके अनिवार्य सहाय्यक अनुदान ( पहिला हप्ता) मंजूर करण्यात येत आहे.**

३ हा खर्च मागणी क्र. ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ - प्रशिक्षण (००) (०७) मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, औरंगाबाद या संस्थेस सहाय्यक अनुदान (अनिवार्य ) ( २०७० ०७४६ ) याखाली सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून "३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली रु. ३,३३,००० /-(रुपये तीन लाख, तेहत्तीस हजार फक्त ) व "३६ सहाय्यक अनुदाने (वेतने)" याखाली रु. १६,६७,०००/- ( रुपये सोळा लाख, सदुसष्ट हजार फक्त ) याप्रमाणे भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१७-२०१८मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

७. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जिल्हा-औरंगाबाद या संस्थेने उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं-२०१७/प्रक्र.७५/अर्थ-३ दि. १८ एप्रिल, २०१७ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०४२११५४४५७१९०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vijaykumar Parshuram Soshte

Digitally signed by Vijaykumar Parshuram Soshte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=106ede43bb7dcc67e6404aaa146fb4c17a872b3754b63c343b66d6b91dd6b276, cn=Vijaykumar Parshuram Soshte
Date: 2017.04.21 15:56:27 +05'30'

**( विजयकुमार प. सोष्टे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रति:-**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा), महाराष्ट्र-२, नागपूर,
३) . मा. अ.मु. स.(सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
४) विभागीय आयुक्त, औरंगाबाद.
५) संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, औरंगाबाद
६) उप संचालक, लेखा व कोषागारे, औरंगाबाद
७) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद
८) उप कोषागार कार्यालय, पैठण, जि.औरंगाबाद.
९) वित्त विभाग (व्यय-४/ अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई
१०) अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, कार्यासन क्रमांक-२५. मंत्रालय, मुंबई
११) निवड नस्ती. (सामान्य प्रशासन विभाग/कार्या. १२ अ)